शैक्षणिक वर्ष २०१७-१८ करीता अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयांमध्ये अतिरिक्त तुकडी सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एनजीसी-२०१७/(१०२/१७)/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०१ ऑगस्ट, २०१७.

**संदर्भ :** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी-२०१०/(१९३/१०) /मशि-४, दि. ३०.१०.२०१०.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी-२०१२/(२४७/१२) /मशि-४, दि. ०२.०९.२०१३.

## शासन आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ व ८३ आणि संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील अकृषी विद्यापीठांनी शै.व. २०१७-१८ साठी नवीन अतिरिक्त तुकड्यांचे प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे सादर केले आहेत. सदर प्रस्तावांची संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये छाननी करण्यात आली.विद्यापीठांच्या शिफारशींच्या अनुषंगाने शासन स्तरावर केलेली छाननी वा महाविद्यालयांनी नॅक मुल्यांकनासाठी केलेला अर्ज व त्या अनुषंगाने प्राप्त LOI ( Letter of Intention) विचारात घेऊन पात्र ठरलेल्या तसेच काही महाविद्यालयांनी केलेली त्रुटींची पुर्तता लक्षात घेऊन, महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२ (५) अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमुद केल्यानुसार नवीन अतिरिक्त तुकड्यांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अ.क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | संस्था/महाविद्यालयाने मागणी केलेल्या अतिरिक्त तुकड्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | १. | निर्मल एज्युकेशन सोसायटीचे निर्मल डिग्री कॉलेज ऑफ कॉमर्स एम.जी.रोड, म्युनिसीपल स्कुल, एम.जी.रोड, कांदिवली (प.), मुंबई-४०० ०६७ | **बी.कॉम.** (४८०-३६०) |
| २. | २. | चेंबूर ट्राम्बे एज्यूकेशन सोसायटीचे एन.जी.आचार्य ॲन्ड कॉमर्स सुभाष नगर जवळ, एन.जी.आचार्य मार्ग, चेंबूर, मुंबई-७१ | **बी.एम.एस.** (६०-१२०)<br>**एम.कॉम.-(ॲडव्हान्स अकांउंन्टसी)** (६०-१२०) |

| अ.क्र. | अ.क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | संस्था/महाविद्यालयाने मागणी केलेल्या अतिरिक्त तुकड्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ३. | ३. | ओशिवरा लेबर मेमोरियल चॅरीटेबल ट्रस्टचे के.एच.एम.डब्लु. कॉलेज ऑफ कॉमर्स रिलीफ रोड, ओशिवरा, जोगेश्वरी (प.), मुंबई-४०० १०२ | **बी.कॉम.** (२४०-१२०) |
| ४. | ४. | निर्मल एज्युकेशन सोसायटीचे विद्या निकेतन डीग्री कॉलेज ऑफ कॉमर्स पंत नगर, बीएमसी स्कुल नं. २, आचार्य अत्रे मैदानासमोर, घाटकोपर (पू.), मुंबई-७५. | **बी.कॉम.** (४८०-३६०) |
| ५. | ५. | शिवाजी शिक्षण संस्था विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय (रात्र) डॉ. अंकुश शंकर गावडे मार्ग, पंतनगर,घाटकोपर (पू.), मुंबई - ४०००७५ | **बी.कॉम.** (३६०-१२०) |
| ६. | ६. | विद्या विकास एज्युकेशन ट्रस्टचे लॉर्डस युनिव्हर्सल कॉलेज ऑफ लॉ | **एल.एल. बी** (३ वर्षे) (६०-१२०)<br>**एल.एल. बी** (५ वर्षे) (६०-१२०) |
| | | **उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ - जळगाव** | |
| ७. | १. | खान्देश एज्युकेशन सोसायटीचे प्रताप महाविद्यालय अमळनेर प्रताप महाविद्यालय, रेल्वे स्टेशन जवळ, अमळनेर, ता. अमळनेर जि. जळगाव | **एम.कॉम** - व्दितीय वर्ष [१ अतिरिक्त तुकडी]<br>**एम.ए.** (राज्यशास्त्र) - व्दितीय वर्ष [१ अतिरिक्त तुकडी] |
| | | **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपुर विद्यापीठ, नागपूर.** | |
| ८. | १. | शिक्षण प्रसारक मंडळ, काटोल संचलित नबिरा महाविद्यालय, धन्तोली, काटोल, जि. नागपूर. | **बी.एस्सी.** (माध्यम-इंग्रजी)<br>**एम.कॉम.**(माध्यम-इंग्रजी) |
| | | **शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर** | |
| ९. | १. | यशवंतराव चव्हाण वारणा महाविद्यालय, वारणानगर. ता. पन्हाळा, जि.कोल्हापूर | **अतिरीक्त तुकडी -**<br>**बी.एस्सी.** भाग - १ (तुकडी क्र. २)१२०<br>**बी.एस्सी.** भाग - ३ (तुकडी क्र. १)१२० |
| १०. | २. | श्री.यशवंतराव पाटील विज्ञान महाविद्यालय,सोळांकूर,ता राधानगरी जि कोल्हापूर | **अतिरीक्त तुकडया -**<br>**बी.एस्सी.** भाग - १ (तुकडी क्र. १)१२०<br>**बी.एस्सी.** भाग - २ (तुकडी क्र. १)१२० |

| अ.क्र. | अ.क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नाव | संस्था/महाविद्यालयाने मागणी केलेल्या अतिरिक्त तुकड्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | | | **बी.एस्सी.** भाग - ३ (तुकडी क्र. १)१२० |
| ११. | ३. | बळवंत कॉलेज, विटा हणमंतनगर, विटा ता. खानापूर, जि. सांगली | **अतिरीक्त तुकडी-**<br>१. **बी.कॉम.**भाग - १<br>२. **बी.एस्सी.**भाग - ३ |
| १२. | ४. | श्री आचार्यरत्न देशभुषण शिक्षण प्रसारक मंडळ संचलित महावीर महाविद्यालय, कोल्हापूर | **अतिरीक्त तुकडी -**<br>**बी.कॉम**. भाग-१ इंग्रजी माध्यम विनाअनुदानित पहिली तुकडी (बी.कॉम. भाग - १ मराठी माध्यम मुळ तुकडीसह एक अतिरिक्त तुकडी सुरू आहे.) १२० |

२. **अटी व शर्ती :-**

१. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात नवीन अतिरिक्त तुकड्या मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालककांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

२. महाविद्यालयाने हमीपत्र सादर केल्याशिवाय किंवा तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

३. महाविद्यालयांनी, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी ३० ऑगस्ट पर्यंत करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

६. संबंधित विद्यापीठांनी, वरील विवरणपत्रातील महाविद्यालयांनी प्रकरणपरत्वे नॅक मुल्यांकन/ पुनर्मुल्यांकन करुन घेण्यासाठी पाठपुरावा करावा.

३. विद्यापीठांनी संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

४. संबंधित विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या अतिरिक्त तुकड्यांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर अतिरिक्त तुकड्यांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर अतिरिक्त तुकड्यांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७३११२१८०५७८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Vasantrao kharke

Digitally signed by Dattatray Vasantrao kharke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, cn=Dattatray Vasantrao kharke
Date: 2017.08.01 17:57:06 +05'30'

( द.व. खारके )
**कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
४) संबंधित संस्था, (विद्यापीठामार्फत)
५) निवड नस्ती (मशि-४).